**शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेस यंत्रसामुग्री खरेदीस सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एसएचएन-२०१९/प्र.क्र.७१/प्रशा-१
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नविन इमारत, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २३ मार्च, २०२३

**वाचा :**
१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१/१२/२०१६.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६/०७/२०१७.
३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दिनांक २४/०८/२०१७.
४) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०२१/प्र.क्र.८/उद्योग-४, दिनांक ०७/०५/२०२१.
५) जिल्हाधिकारी तथा जिल्हा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, नागपूर यांचे पत्र क्र.जिनिस/कार्या३७/जिवायो/का-५/१९५/२०१८-१९, दिनांक ०५.०२.२०१९
६) जिल्हाधिकारी तथा जिल्हा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, नागपूर यांचे पत्र क्र.जिनिस/कार्या३७/जिवायो/का-५/५०१/२०१८-१९, दिनांक ०५.०३.२०१९
७) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्र. जीएचएन-२०१९/प्र.क्र.७१/प्रशा-१, दिनांक ०२.०८.२०१९
८) आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. डीएमईआर-२२०११/३३/२०२३-पीआरओसी१, दिनांक ०९.०२.२०२२.

**प्रस्तावना:-**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेस शासन निर्णय, दिनांक ०२.०८.२०१९ अन्वये जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत उपलब्ध अनुदानातून रुपये ८,३०,००,०००/- इतक्या किंमतीची यंत्रसामुग्री खरेदी करण्यास यापूर्वी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती.

सदर प्रशासकीय मान्यतेस अनुसरुन हाफकीन महामंडळ स्तरावर यंत्रसामुग्री ई-निविदा खरेदी प्रक्रिया राबविण्यात आली असता निविदेतील निविदाधारकाने अपूर्ण कागदपत्रे सादर केल्याने सदर यंत्राची निविदा रद्द केल्याने यंत्राची खरेदी संस्थेस करता आलेली नाही. तसेच, सदर प्रशासकीय मान्यता आदेश हा एक वर्षापेक्षा जास्त कालावधी झालेला असल्याने त्यास सुधारीत प्रशासकीय मान्यता देणे आवश्यक आहे. त्यास अनुसरुन संचालनालयाच्या संदर्भ क्र.०८

येथील दिनांक ०९.०२.२०२३ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेस उपरोक्त संदर्भ क्र.०५ मध्ये नमूद शासन निर्णयातील न्युक्लीअर मेडीसीन (सेटींग अप स्टेट ऑफ आर्ट न्युक्लीयर मेडीसीन डायग्नोस्टीक इमेजींग सेंटर ऑन टर्न की बेसीस) यंत्रसामुग्री खरेदीकरीता जिल्हा नियोजन समितीने रुपये ८,३०,००,०००/- पैकी रुपये ४,८१,८९,३६०/- इतका निधी वितरीत केला आहे. उर्वरीत रुपये ३,४८,१०,६४०/- इतका निधी वितरित करणे शिल्लक आहे. मूळ शासन निर्णयातील मान्यतेनुसार सदर सुधारीत प्रशासकीय मान्यतेसाठी लागणारी पूर्ण रक्कम रुपये ८,३०,००,०००/- इतका निधी जिल्हा वार्षिक योजनेतून उपलब्ध करण्याच्या अटीच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता या शासन निर्णयान्वये प्रदान करण्यात येत आहे.

२. **सदर सुधारीत प्रशासकीय मान्यता ही खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रदान करण्यात येत आहे :-**

१) सदर विषयी मूळ प्रशासकीय मान्यतेमधील अ.क्र.४ वगळता सर्व अटी व शर्ती या कायम राहतील.

२) सदर विषयी खरेदी करण्यात येणा-या यंत्रसामुग्रीची संस्थेस आवश्यकता असल्याची व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खातरजमा आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) व संबंधित अधिष्ठाता यांनी केलेली आहे.

३) प्रस्तावित साधनसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भूत केलेला नसल्याबाबत व सदर साधनसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांनी खात्री करावी.

४) प्रस्तुत विषयी करण्यात येणा-या यंत्रसामुग्री खरेदीची द्विरुक्ती होणार नाही याची खातरजमा आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) व संबंधित अधिष्ठाता यांनी केलेली आहे.

५) प्रस्तुत विषयी करण्यात येणा-या यंत्रसामुग्री खरेदीत कोणतीही आर्थिक अनियमितता उद्भवल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) व संबंधित अधिष्ठाता यांची राहिल.

६) जिल्हा नियोजन समितीकडून प्राप्त होणारा निधी असल्याने संदर्भ क्र.०७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: विअप्र-२०१३ / प्र.क्र.३० / १३/ विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३३११०१०४४९८१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2023.03.31 16:31:41 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. **आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई**
२. महालेखाकार - २ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
६. निवडनस्ती (प्रशा-१)